**श्रीसंत सेवालाल महाराज, पोहरादेवी, जि.वाशिम या तीर्थक्षेत्राच्या विकास आराखडयांतील कामांस निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि २०१९/प्र.क्र.११५/योजना-६,**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई ४०० ००१
दिनांक : ०७ ऑगस्ट,२०२० .

**वाचा :-**

१. ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि-२०१७/प्र.क्र.७८/योजना-६, दिनांक २२ नोव्हेंबर, २०१७.

२. ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि-२०१९/प्र.क्र.४१/योजना-६, दिनांक ०८ मार्च, २०१९ .

३. ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि २०१९/प्र.क्र.६२/भाग-२/योजना-६,दि.२७.११.२०१९

**प्रस्तावना :-**

श्रीसंत सेवालाल महाराज, पोहरादेवी, जि.वाशिम या तीर्थक्षेत्राच्या विकास आराखडयास संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ अन्वये रू.२५.०० कोटी इतका निधी मंजूर झाला होता. तसेच सदर तीर्थक्षेत्राच्या अतिरिक्त विकास आराखडयांतील एकूण रु. ७५.०० कोटी रकमेच्या कामांना संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने, सदर तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी करावयाच्या विकास कामांना निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

श्रीसंत सेवालाल महाराज, पोहरादेवी, जि.वाशिम या तीर्थक्षेत्राच्या अतिरिक्त विकास आराखडयांतील संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ अन्वये रू.५.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. तसेच संदर्भाधीन शासन निर्णय क्र.३ अन्वये रू. ६.०० कोटी इतका निधी जिल्हाधिकारी, वाशिम यांना वितरीत करण्यात येत आहे. अशाप्रकारे आतापर्यंत रू.११.०० कोटी इतका निधी जिल्हाधिकारी,वाशिम यांना वितरीत करण्यात आला आहे. सन २०२०-२१ साठी सदर योजनेखाली रू.२५.०० कोटी तरतुद उपलब्ध असून सदर तरतुदीतुन विवरणपत्रातील खालील कामांसाठी रू.७.५० कोटी इतका निधी वितरीत करण्यात येत आहे. (रक्कम रू.कोटी)

| अ.क्र. | कामाचे नाव | संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ व २ नुसार प्रशासकीय मान्यतेची रक्कम | खर्च | वितरीत तरतुद |
|---|---|---|---|---|
| १ | प्रदर्शन केंद्राचे बांधकाम करणे | १८.८४१० | ७.१० | ७.५० |
| | **एकूण** | **१८.८४१०** | **७.१०** | **७.५०** |

२. सदर तीर्थक्षेत्राच्या संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेल्या अतिरिक्त विकास आराखड्यातील बहुतांशी कामे पूर्वीच्या आराखड्यातील मंजूर कामांशी साधर्म्य असलेले असल्याने एकाच कामावर खर्चाची द्विरुक्ती होणार नाही याची खबरदारी जिल्हाधिकारी, वाशिम यांनी घ्यावी.

३. संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ व २ मधील मंजूर कामे पूर्ण करण्याकरिता शासन उक्त निधी वितरीत करीत आहे. सबब, सदर निधी संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेला वितरीत करतांना व प्रत्यक्ष खर्च करतांना तसेच सदर कामे पूर्ण करताना उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णय निर्णय क्र. १ व २ मध्ये नमूद केलेल्या अटी- शर्ती व त्यात दिलेले संबंधित निदेश व प्रचलित नियम लागू राहतील.

४. सदर कामांच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिका-यांची तांत्रिक मंजूरी (Sanctioned) असल्याची व बांधकामासाठी लागणारी आवश्यक जागा ग्रामपंचायत/जिल्हा परिषद मालकीची आहे याची जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील कार्यकारी समितीने खात्री करून पुढील कार्यवाही करावी.

५. मंजूर निधीचा योग्यरितीने विनियोग होण्याच्या व कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही या दृष्टीने जिल्हाधिकारी, वाशिम यांनी दक्षता घ्यावी. सदर कामांचा त्यांनी वेळोवेळी आढावा घेऊन कामावर देखरेख ठेवावी व कामांचा भौतिक प्रगती अहवाल व खर्चाची माहिती विहित मुदतीत सादर करावी. तसेच जिल्हाधिकारी, वाशिम यांनी या योजनेकरिता झालेल्या/होणाऱ्या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयातील खर्चाशी ताळमेळ घेऊन त्यामध्ये तफावत राहणार नाही , याबाबत दक्षता घ्यावी व सदर निधी आवश्यक बाबींवर खर्च झाला असल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व महालेखापालांस सादर करावे.

६. राज्यशासनामार्फत वेळोवेळी प्रस्तुत योजनेविषयी व वित्त विषयक वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले आदेश/नियम/शासन निर्णय/वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करून वरील वितरीत तरतुदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७. सदर कामांचे नियोजन व खर्चाचे सनियंत्रण, नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक तीक्षेवि-२०१५/प्र.क.६/१४४४, दिनांक ४ जुन २०१५ अन्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय कार्यकारी समितीकडे सोपविण्यात येत आहे. समितीची कार्यकक्षा शासन निर्णयात नमूद केल्यानुसार राहिल.

८. त्याचप्रमाणे सर्व संबंधितांचे लक्ष या विभागाच्या शासन निर्णय दि.१६.११.२०१२ कडे वेधण्यात येत असून पशू हत्या व अंधश्रध्दा वाढीला प्रोत्साहन देणाऱ्या तीर्थक्षेत्रांना निधी वितरीत केला जाणार

नाही. सबब संबंधित तीर्थक्षेत्रस्थानी असे प्रकार शासनाच्या निदर्शनास आल्यास योग्य ती कार्यवाही केली जाईल व शासकीय अनुदान थांबविले जाईल .

९. जिल्हास्तरीय कार्यकारी समितीने कामांच्या अंमलबजावणीसाठी संबंधीत कार्यान्वयीन यंत्रणांशी समन्वय साधावा व कामे विहीत कालावधीत पूर्ण होण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना कराव्यात.

१०. उपरोक्त कामांवरील खर्च मागणी क्र.एल-०३ "२५१५, इतर ग्रामविकास कार्यक्रम -१९६, जिल्हापरिषदांना सहाय्य-(००)(०९) ग्रामीण भागातील यात्रास्थळांच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम - श्री संत सेवालाल महाराज , पोहरादेवी, जि. वाशिम-(२५१५ २५८४), (कार्यक्रम), ३१-सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

११. सदर निधी वितरीत करतांना वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ.-३, दि. १६.४.२०२० च्या परिपत्रकामधील अटी व शर्तीचे पालन करण्यात आले आहे.

१२. सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.२७६(ब)/का.१४४४,दि.८ जुलै, २०२० व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. १८९-/व्यय-१५,दि.३१,जुलै,२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८०७१६०३२२३०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Eknath Kashinath Gagare

Digitally signed by Eknath Kashinath Gagare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=d9a3ccbc053d2cf9b4c30c85bb8db0e6c39331b90d48b0aba6cde387b5ec208c, serialNumber=6bc79f4a08ca2d5d74e02e7214f6aad4ef7d9afdeba5bfcdef24d45049099939, cn=Eknath Kashinath Gagare
Date: 2020.08.07 17:02:39 +05'30'

**( एकनाथ गागरे )**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, मुंबई.
२) मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (वित्त व नियोजन ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.).यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा.मुख्य सचिव, यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई

७) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९) प्रधान सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंबई
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर
१२) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर
१३) विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, अमरावती विभाग, अमरावती
१४) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, वाशिम
१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम
१६) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद , वाशिम
१७) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, वाशिम
१८) जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम
१९) नियोजन विभाग (का.१४७४/१४४४) मंत्रालय, मुंबई-३२.
२०) वित्त विभाग (व्यय -१५, अर्थसंकल्प-१६/१७), मंत्रालय, मुंबई ३२.
२१) कक्ष अधिकारी, कार्यासन क्र.वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्राम विकास विभाग
२२) निवड नस्ती (का.यो-६). ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.